अपर जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांना त्यांच्या जुन्या निर्लेखित वाहनांच्या बदली नवीन वाहने खरेदी करण्यास मंजुरी देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वाहने-२०२३/प्र.क्र. ८४/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २१ जुलै, २०२३.

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. जेपीएस-२०१४/प्र.क्र.११/ई-८, दि. ०२/१२/२०१७
२)शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दि.२८/०७/२०२०.
३)महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण-२०२२/प्र.क्र.४०/ई-८,दि. २७/०६/२०२२.
४) नियोजन विभाग,शासन ज्ञापन क्र.डीएपी-१०२२/प्र.क्र.१३९/का.१४८१,दि.१६/०१/२०२३.
५)जिल्हाधिकारी, मुंबई यांचे पत्र क्र. अभिलेख कक्ष/टे-१/वाहन खरेदी/निधी/२०२३/७५५७, दि. २०/०४/२०२३.

**प्रस्तावना:-**

कोंकण महसूल विभागातील लेखाशिर्ष “२०५३- जिल्हा प्रशासन” या खाली वेतन आहरित करणाऱ्या ९७ क्षेत्रीय अधिकाऱ्यांना शासकीय वाहनांची अनुज्ञेयता संदर्भाधीन दि.०२/१२/२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली आहे. अपर जिल्हाधिकारी, मुंबई यांनी त्यांच्या संदर्भाधिन दि. २०/०४/२०२३ च्या पत्रान्वये त्यांच्याकरिता निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली नवीन वाहन खरेदीस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

कोकण महसूली विभागातील अपर जिल्हाधिकारी,मुंबई यांना त्यांच्या पूर्वीच्या जुन्या निर्लेखित वाहन क्र. MH-०१-AN-०७७७ च्या बदली नवीन वाहने खरेदी करण्यास व तदप्रित्यर्थ येणाऱ्या रु. ८.०० लाख (रुपये आठ लाख फक्त) च्या खर्चास खालील अटींच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.-

१. **निधी उपलब्धतेच्या अनुसार,** शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दिनांक २८/०७/२०२० च्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार अपर जिल्हाधिकारी,मुंबई, यांना रु.८.०० लाखाच्या कमाल मर्यादेत (वाहनाची किंमत + वस्तू व सेवा कर + टेम्परररी रजिस्ट्रेशन चार्जेस + मूल्यवर्धित कर + सहाय्यभूत साहित्य (Accessories) इत्यादी अंतर्भूत करुन) वाहन खरेदी करण्यात यावी.
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि. ०१/१२/२०१६ व क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र. २१५/उद्योग-४, दि. २४/०८/२०१७ च्या शासन निर्णयानुसार वाहन खरेदी GeM Portal वरुन विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.
३. सदर निर्लेखित वाहनांच्या बदली यापूर्वी नवीन वाहने खरेदी करण्यात आले नाही, या धारणेच्या अधिन राहून नवीन वाहन खरेदीस शासन मान्यता देत आहे.

२. सदर नविन वाहन खरेदीवरील खर्च हा लेखाशिर्ष “मागणी क्र. सी-१० २०५३ जिल्हा प्रशासन (००)०९३-जिल्हा आस्थपना (०१) सर्वसाधारण आस्थपना (०१)(०१) आयुक्त कोकण (२०५३ ००२८) अंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध करून दिलेल्या निधीतून **अथवा** सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता जिल्हा वार्षिक योजने अंतर्गत "गतिमान प्रशासन तथा आपात्कालीन व्यवस्थेचे बळकटीकरण" या

योजनेच्या माध्यमातून नियोजन विभागाने मुंबई जिल्ह्यास उपलब्ध करून दिलेल्या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २१०/२०२३/विनियम, दिनांक १४/०६/२०२३ व अनौपचारीक संदर्भ क्रमांक १८३/२०२३/व्यय-९, दि.०१/०६/२०२३ अन्वये त्या विभागाने दिलेल्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०७२४१२१०४७५०१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DR.SHWETA SAWDEKAR BAIG

Digitally signed by DR.SHWETA SAWDEKAR BAIG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=6281ac1913ceb1456ffcfd8e5d3dbe032cfa746426763d6351cb898b72986801, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2FA86D3D30D0DE896CC35E8F420B067861B1ECA1D14FF010A5202C61E6ADC6FE, cn=DR.SHWETA SAWDEKAR BAIG
Date: 2023.07.24 13:22:59 +05'30'

**( डॉ.श्वेता सावदेकर-बेग )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण.
जिल्हाधिकारी, मुंबई शहर.
अपर जिल्हाधिकारी,मुंबई शहर.
प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) -२, महाराष्ट्र, मुंबई .
जिल्हा कोषागार अधिकारी,मुंबई
सह सचिव/उप सचिव, वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/विनियम), मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.